**सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात केंद्र शासन पुरस्कृत स्मार्ट सिटी अभियानांतर्गत दुसऱ्या टप्प्यात निवडण्यात आलेल्या राज्यातील पाच स्मार्ट शहरांना स्मार्ट शहरांना स्मार्ट सिटी प्रस्तावांची प्रशासकीय व कार्यालयीन खर्चाकरीता निधीचे वितरण (केंद्र हिस्सा).**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. स्मार्टसि-२०१७/प्र.क्र. ६१/नवि-२३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक- ०१ मार्च, २०१७

**संदर्भ**:- (१) केंद्र शासन आदेश क्र. के-१५०१६/१४७(८)/२०१५-एससी-१, दिनांक ११.०१.२०१७
(२) केंद्र शासन आदेश क्र. के-१५०१६/१४७ (७)/२०१५-एससी-१, दिनांक ०४.०१.२०१७
(३) केंद्र शासन आदेश क्र. के-१५०१६/१४७ (८)/२०१५-एससी-१, दिनांक ०४.०१.२०१७
(४) केंद्र शासन आदेश क्र. के-१५०१६/१४७ (९)/२०१५-एससी-१, दिनांक ०४.०१.२०१७
(५) केंद्र शासन आदेश क्र. के-१५०१६/१४७ (२)/२०१५-एससी-१, दिनांक ०४.०१.२०१७
(६) शासन निर्णय क्र.स्मार्टसि.-२०१६/अनौस-५८/प्र.क्र.२६१/नवि-२३, दिनांक १८.०६.२०१६

**प्रस्तावना:-**

केंद्र शासन पुरस्कृत स्मार्ट सिटी अभियानांतर्गत दुसऱ्या टप्प्यात निवडलेल्या राज्यातील कल्याण-डोंबिवली, नागपुर, नाशिक, ठाणे व औरंगाबाद या पाच शहरांकरीता प्रशासकीय व कार्यालयीन खर्चाकरीता केंद्र शासनाने मुक्त केलेली प्रत्येकी रु.२.०० कोटी याप्रमाणे एकुण रु. १०.०० कोटी इतकी रक्कम संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

**(१)** केंद्र शासन पुरस्कृत स्मार्ट सिटी अभियानांतर्गत दुसऱ्या टप्प्यात स्पर्धात्मक पध्दतीने निवडण्यात आलेल्या कल्याण-डोंबिवली, नागपुर, नाशिक, ठाणे व औरंगाबाद या पाच शहरांना अभियानांतर्गत प्रशासकीय व कार्यालयीन खर्चाकरीता केंद्र शासनाने संदर्भाधीन क्र. १ ते ५ नुसार प्रत्येकी रुपये २.०० कोटी याप्रमाणे एकूण रुपये १०.०० कोटी इतका निधी वितरीत केला आहे.

सदर निधी खालील तत्क्यात विर्निदीष्टीत केल्याप्रमाणे जिल्हाधिकारी, ठाणे, नागपुर, औरंगाबाद, नाशिक यांच्या बीडीएस प्रणालीवर वर्ग करण्यात येत आहे.

**(रूपये कोटीत)**

| अ. क्र | नागरी स्थानिक स्वराज संस्था | जिल्हा | केंद्र शासनाने वितरीत केलेला निधी | | उपलब्ध निधीच्या मर्यादेत सध्या वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|
| | | | निधी | उद्देश | |
| १ | कल्याण-डोंबिवली | ठाणे | २.०० | प्रशासकीय व कार्यालयीन खर्च | २.०० |
| २ | नागपुर | नागपुर | २.०० | प्रशासकीय व कार्यालयीन खर्च | २.०० |
| ३ | नाशिक | नाशिक | २.०० | प्रशासकीय व कार्यालयीन खर्च | २.०० |
| ४ | ठाणे | ठाणे | २.०० | प्रशासकीय व कार्यालयीन खर्च | २.०० |
| ५ | औरंगाबाद | औरंगाबाद | २.०० | प्रशासकीय व कार्यालयीन खर्च | २.०० |
| **एकूण** | | | **१०.००** | -- | १०.०० |

**(२)** सदर निधी वितरणासाठी संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांना नियंत्रक अधिकारी म्हणून म्हणून घोषित करण्यात येत आहे. जिल्हाधिकारी कार्यालयातील संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर निधीबाबतचे देयक कोषागार कार्यालयात सादर करून स्मार्ट सिटी अभियान राबविण्याकरीता स्थापन करण्यात आलेल्या संबंधित शहराच्या विशेष उद्देश वहनाच्या नावाने उपरोक्त विवरणपत्रामध्ये दर्शविल्यानुसार विहित कार्यपध्दतीनुसार तीन दिवसाच्या आत वितरीत करणेबाबत आवश्यक कार्यवाही करून याबाबत केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.

**(३)** उपरोक्त अनुदानाचा वापर करण्याची मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

(अ) उक्त निधी जिल्हाधिकारी, ठाणे, नागपुर, औरंगाबाद, नाशिक यांनी क्रमशः ठाणे स्मार्ट सिटी लिमिटेड, नागपुर स्मार्ट ॲन्ड सस्टेनेबल सिटी डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन लिमिटेड, औरंगाबाद स्मार्ट सिटी डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन लिमिटेड, नाशिक म्युनिसिपल स्मार्ट सिटी डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन लिमिटेड व स्मार्ट कल्याण-डोंबिवली डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन लिमिटेड या पाच विशेष उद्देश वहनांना आदेश मिळाल्यापासून तीन दिवसात वितरीत करणे आवश्यक राहील.

(ब) शासन निर्णय दिनांक १८.०६.२०१६ मधील नमुद अटींची पुर्तता केल्यानंतरच ठाणे स्मार्ट सिटी लिमिटेड, नागपुर स्मार्ट ॲन्ड सस्टेनेबल सिटी डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन लिमिटेड, औरंगाबाद स्मार्ट सिटी डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन लिमिटेड, नाशिक म्युनिसिपल स्मार्ट सिटी डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन लिमिटेड व स्मार्ट कल्याण-डोंबिवली डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन

लिमिटेड यांना सदर निधी वापरता येईल. तसेच उक्त अटींची पुर्तता करण्याची व सदर निधी अटींची पुर्तता झाल्यानंतरच वापरण्याची संपुर्ण जबाबदारी संबधित महानगरपालिकेचे आयुक्त व संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, विशेष उद्देश वाहनाच्या (एस.पी.व्ही.) यांची संयुक्तीकपणे राहिल.

(क) सदर निधीचा प्रकल्पाव्यतिरिक्त इतर बाबींवरील खर्चासाठी वापरता येणार नाही व तसे झाल्यास ही आर्थिक अनियमितता मानली जाईल. अशा अनियमिततेसाठी संबंधित महानगरपालिका आयुक्तांची पूर्णपणे जबाबदार राहिल

(ड) सदर निधीचा विनियोग ज्या कारणांसाठी निधी मंजूर केला आहे त्याच कारणांसाठी करण्यात यावा. सदर निधी खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र, तसेच प्रकल्पाचे उद्दिष्ट व साध्य याची माहिती केंद्र शासनाने विहित केल्याप्रमाणे सादर करणे बंधनकारक राहील.

(इ) सदर शासन निर्णयान्वये प्राप्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमुन्यात उपलब्ध करून संबंधित महालेखापाल कार्यालयाकडे सादर करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी या नात्याने संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

**(४)** उपरोक्त विवरणपत्रामध्ये नमूद रूपये १०,००,००,०००/- (रूपये दहा कोटी फक्त) इतक्या रक्कमेचा खर्च हा नगर विकास विभाग- मागणी क्रमांक एफ-२, २२१७, नगर विकास, १९१- महानगरपालिकांना सहाय्य, केंद्र सहाय्यीत योजना (००) (०६) स्मार्ट सिटी अभियानासाठी महानगरपालिकांना सहाय्य (केंद्र हिस्सा २%) (२२१७ ९९३९), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर), दत्तमत, या लेखशिर्षामधून सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**(५)** सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक, अर्थसं-२०१७/ प्र.क्र.८९/ अर्थ-३, दिनांक ०८.०२.२०१७ तथा वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.१२९/अर्थ-१६, दिनांक १८.०२.२०१७ च्या मंजूरी अन्वये निधी वितरीत करण्यास देण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**(६)** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१७०३०२१२३८५३५०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Ajit Malhari Kawade

Digitally signed by Ajit Malhari Kawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=597d3c4c02c1add96119d79fc4b21063ef289863535a77211cf42daa12e539dd, serialNumber=49349d578c976e0d05a9793ef412604378bdf9fed13d605caba002427a7c370b, cn=Ajit Malhari Kawade
Date: 2017.03.02 12:42:37 +05'30'

**(अजित म.कवडे)**
**अवर सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा.विरोधी पक्ष नेते, महाराष्ट्र विधानसभा, यांचे खाजगी सचिव
४. मा.विरोधी पक्ष नेते, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव
५. मा.मंत्री, वित्त व नियोजन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.राज्यमंत्री, नगर विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग,
१०. अप्पर मुख्य सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
११. प्रधान सचिव, नगर विकास विभाग-१, मंत्रालय, मुंबई
१२. प्रधान सचिव, (नगर विकास-२), मंत्रालय, मुंबई
१३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई
१५. महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपुर
१६. सह सचिव (अर्थसंकल्प), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. जिल्हाधिकारी, ठाणे/औरंगाबाद/नागपूर/नाशिक
१८. मुख्य कार्यकारी अधिकारी, ठाणे स्मार्ट सिटी लिमिटेड/नागपुर स्मार्ट ॲन्ड सस्टेनेबल सिटी डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन/औरंगाबाद स्मार्ट सिटी डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन लिमिटेड/नाशिक म्युनिसिपल स्मार्ट सिटी डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन/स्मार्ट कल्याण-डोंबिवली डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन लिमिटेड
१९. आयुक्त ठाणे/औरंगाबाद/नागपूर/नाशिक/कल्याण-डोंबिवली महानगरपालिका.
२०. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/औरंगाबाद/नागपूर/नाशिक जिल्हा
२१. जिल्हा प्रशासन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, ठाणे/औरंगाबाद/नागपूर/ नाशिक जिल्हा
२२. निवड नस्ती, नवि-२३